**“विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथे पुरविण्यात आलेल्या अवैद्यकीय कंत्राटी सेवेचे प्रलंबित देयक अदा करण्यास परवानगी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र.९४/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०९ डिसेंबर, २०१९.

वाचा :

1) **सह संचालक, आरोग्य सेवा रुग्णालय (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक- ससंआसे/ /कक्ष-३/टे-३/विसंसेरु,अमरावती/कंत्राटी सेवा/३४७२-७४/१९ दि.२७.०२.२०१९.**

**प्रस्तावना :**

विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथे पुरविण्यात आलेल्या अवैद्यकीय कंत्राटी सेवेची प्रलंबित देयके अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

२. विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथे अमरावती नागरी सेवा सह. संस्था मार्फत माहे फेब्रु. २०१८ ते जाने. २०१९ या कलावधीमध्ये पुरविण्यात आलेल्या तांत्रिक मनुष्यबळ सेवा साठी रु.४६,३६,३९८/- (सेहचाळीस लक्ष छत्तीस हजार तीनशे अठ्ठेनव फक्त) चे व प्रबुध्द विविध सेवा सहकारी संस्था मर्या. अमरावती मार्फत माहे फेब्रुवारी, २०१८ ते एप्रिल, २०१८ या कालावधीतील स्वच्छता व कक्ष सेवक सेवाचे रु.२१,९३,९८२/- (एकविस लक्ष, त्रेन्नोव हजार, नऊशे बेंशी फक्त) चे प्रलंबित देयके अदा करण्यास खालील अटीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे:-

सदर प्रस्तावातील नमूद केलेली कंत्राटी सेवा प्रचलित नियमानुसार आखून दिलेल्या कार्यपध्दतीचे व सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात आलेले आहे, याची संबंधीत अधिकाऱ्यांनी खात्री करावी.

1) सदर प्रस्तावातील नमूद केलेली कंत्राटी सेवा प्रत्यक्षात संबंधित रुग्णालयास मिळाली आहे, याबाबतची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.
2) सदर प्रस्तावातील कंत्राटी सेवेचे देयके यापूर्वी प्रदान करण्यात आलेले नाही यांची संबंधित अधिकाऱ्याने खात्री करावी.

३) सदर देयकांच्या बाबींबाबत काही अनियमितता उद्भवल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित अधिकारी यांची राहील.

४) सन ४२५९ २२१० या आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष १९-२०१८उपशिर्ष -१३कार्यालयीन खर्च या बाबी खाली शिल्लक असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

५) नवीन ई-निविदा तात्काळ करण्यात त्या अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-एक मधील अनुक्रमांक-६, नियम ४० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०२१२५०३८५७१७ असा आहे. देश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2019.12.09 15:05:12 +05'30'

**( रो.दि. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुगणालय राज्यस्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अकोला.
७. अधिक्षक विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. अमरावती.
९. निवडनस्ती (आरोग्य-३).